# तिचा अवकाश

साठोत्तरी साहित्यात स्त्रीवादी साहित्याचा प्रवाह गतिमान झाल्याचे दिसते स्त्रीवादी साहित्य म्हणजे पुरुषांना विरोध करणारे साहित्य असा अर्थ नसून स्त्रीलाही सन्मान मिळावा व पुरुषप्रधान मानसिकतेतून समाज बाहेर पडावा याचा आग्रह धरणारे साहित्य. स्त्री पुरुष समानतेचा पुरस्कार करणारे साहित्य म्हणजेच स्त्रीवादी साहित्य होय. स्त्रीला देवता मानून शब्दांचे छल करत आजपर्यंत तिची फसवणूक झाली. पुरुषांच्या तुलनेत तिला कमजोर मानले गेले. तिचे मन आणि स्वाभिमान दोन्ही चिरडले गेले. तिच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन भोगवादी नजरेतूनच पाहण्याचा राहिला. या साऱ्यालाच हे साहित्य विरोध करते. समाजात स्त्री-पुरुष समानता निर्माण व्हावी हा आग्रह हे साहित्य धरताना दिसते.निसर्गाने स्त्रियांच्या वर दिलेली जबाबदारी स्त्रिया टाळत नाहीत.पण संस्कृती आणि रूढी परंपरांच्या नावाखाली तिच्यावर लादल्या गेलेल्या जबाबदाऱ्या आणि तिचे व्यक्तिमत्त्व आणि कर्तृत्व बहरू न देण्यासाठी पुरुषप्रधान व्यवस्थेने निर्माण केलेली व्यवस्था मात्र हे साहित्य नाकारते. स्त्रिया लिहू लागल्यावर कथा, कादंबरी, नाटक, कविता, आत्मचरित्र, चरित्र, आत्मकथन अशा अनेक साहित्य प्रकारांनी स्त्रीवादी साहित्य लिहिले गेले आहे. विभावरी शिरूरकर, गौरी देशपांडे, आशा बगे, प्रिया तेंडुलकर, प्रज्ञा पवार, कमल देसाई, सानिया अशी कितीतरी मोठी मराठी कथा लेखिकांची यादी आपणास देता येईल. स्त्रियांच्या अंतरंगातील अनेक प्रश्नांना त्यांच्या कथेतून त्यांनी प्रकट केल्याचे दिसते. मराठी कथा वाङ्मय समृद्ध करत असतानाच स्त्रियांच्या अंतरंगात डोकावून त्यांनी वाचकांनाही अस्वस्थ करून सोडले आहे. अशाच लेखिकांच्या कथा साहित्यातून प्रकट होणाऱ्या भावभावनांचे, त्यांच्या अंतरंगातील विचार कल्लोळाचे, जीवनाशी चाललेल्या संघर्षाचे अनेकरंगी वायुभवाचे पदर तिचा अवकाश' या कथासंग्रहातून उलगडत जाताना दिसतात. जीवनातील गुंतागुंत आणि त्यात भावनिकदृष्ट्या स्त्रियांची होणारी घुसमट यामुळे स्त्रिया आपले स्वत्व विसरून जातात. पुरुषप्रधान व्यवस्थेवरोबर त्या फक्त फरफटत जातात. त्यांची होणारी होरपळ या कथांतून स्पष्ट होते

तिचा अवकाश' या कथासंग्रहात आघाडीच्या कथा लेखिकांच्या दहा कथा समाविष्ट केल्या आहेत. प्रत्येक कथा ही स्त्रियांच्या वेगळ्या दुःखाची मांडणी करताना दिसते. स्त्रियांना वरवर दिलेले अधिकार किती फोल आणि पोकळ आहेत याचेही दर्शन घडवते. कुटुंबासाठी, घरासाठी, समाजासाठी तिला आपल्या इच्छा, आशा, अपेक्षा, आकांक्षा कशा माराव्या लागतात याचेच दर्शन या कथा घडवतात.

तिचा अवकाश' या कथासंग्रहातील पहिली कथा 'पाऊस आला मोठा' ही गौरी देशपांडे यांची कथा आहे. मराठीतील आघाडीच्या कथा लेखिका म्हणून गौरी देशपांडे यांची ओळख आहे. 'आहे हे असं आहे' या कथासंग्रहातील ही कथा असून गौरी देशपांडे यांचे खूप साहित्य प्रकाशित आहे. अनुवादित साहित्य हे त्यांनी मोठ्या प्रमाणात लिहिले आहे. नात्यातील

कोरडेपणातही मायेचा, प्रेमाचा ओलावा शोधणारी ही कथा आहे. या कथेची नायिका सावी आहे. ती नामांकित वकिलाची मुलगी असली तरी वडिलांचा स्वभाव खूपच कडक आहे. बोलणे तर खूपच कमी आणि तुटक असे आहे. सावीची आई ती लहान असतानाच मृत्यू पावल्याने वडिलांनी दुसरे लग्न केले नाही. ती दहावीत असताना त्यानी सावी पेक्षा चार-पाच वर्षांनी मोठ्या असणाऱ्या आम्मीला घरी लग्न करून आणल्यावर मात्र सावीला याचा धक्काच बसतो. घरात मोजकाच संवाद होत असतो. त्यातही सावी आम्मीशी तुटकपणेच बोलत असते. वडिलांचा स्वभाव खूपच शिस्तीचा आणि कडक असल्याने सावीशी त्यांचा वाद होत राहतो. त्यातूनच सावी हळूहळू आम्मीच्या जवळ जाते. एक दिवस सावीच्या घरी येण्यावरून झालेल्या वादात आप्पांचा संताप वाढत जातो आणि ते सावीच्या कानाखाली आवाज काढतात. त्यावेळी आप्पांशी कधीही न बोलणारी आम्मी सावीची बाजू घेते. पंधरा वर्षाच्या मोठ्या वाढलेल्या, बरोबरीच्या मुलीवर एकराचाकरांदेखत हात उगारता। तिनं लाज सोडली तर तुम्ही तर लहान नाही ना । काय हे!  अशा पद्धतीने ज्यावेळी ती आप्पांशी बोलते त्यावेळी सावीलाही तिच्या धाडसाचं आणि आपल्यावर असणाऱ्या प्रेमाची जाणीव होते. आप्पांच्या तुसड्या स्वभावामुळे सावी हळूहळू आम्मीच्या जवळ जाते. पण या दोघीतही फारसे बोलणे होत नसते फारशी आपुलकी नसते सावी पुढे मुंबईला शिक्षणासाठी जाण्याचा आग्रह धरते. त्या वेळी वडिलांशी तिचा वाद होतो. आप्पांनी सावीला साऱ्या गोष्टी वेळच्या वेळी झालेल्या चांगल्या' असे म्हटल्यानंतर सावी खूपच संतापते आणि आप्पांना म्हणते, 'माझ्या काय गोष्टी आप्पा तुम्ही वेळच्यावेळी केल्या?' माझ्या दाताला वसेस लावायला जॉन बटलर माझ्याबरोबर. मला पाळीविळीची माहिती देणारे फॅमिली डॉक्टर मला ब्राज घ्यायला तुमची स्टेनो बाप आपली आई होऊ शकला नाही ही खंत सावीच्या या उद्गारातून व्यक्त होते. त्याच वेळी पुन्हा एकदा सावीच्या बचावासाठी आम्मी या वादात उतरते त्याच वेळी सावित्रीकडून आम्मीचाही पाणउतारा होताना आपल्याला दिसतो असेच बरेच दिवस निघून जातात आणि त्यानंतर सावीच्या वडिलांचे निधन होते  सावीही चांगल्या नोकरीत रममाण झालेली असते.

एक दिवस तिच्या घरी आम्मी येते. तिला पाहिल्यानंतर सावीला आश्चर्यांचा धक्का बसतो पण तिचे वडील गेल्याचे सांगितल्यानंतर पुन्हा दुसरा धक्का सावीला बसतो. ती त्यादिवशी सुट्टी घेते आणि बाप गेल्याचे दुःखही तिला मनोमन होते आम्मीने हे का नाही सांगितले याचा राग येतो. आम्मी हे का सांगू शकली नाही हे कळाल्यावर आम्मीविषयीची आस्था तिच्या मनात अधिकच वाढते. सारे काही सावीच्या नावावर ठेवून आम्मीला जुजबी मालमत्ता ठेवलेली असते सावीकडे आल्यानंतर आम्मी पाच सहा महिन्यात आजारी पडते आणि दवाखान्यात घेऊन गेल्यानंतर आम्मीच्या जीवनाचा अधुरा भाग सावीला समजतो. आपल्याकडून झालेल्या चुकीचाही साक्षात्कार होतो. सुकलेल्या नात्यातही किती ओलावा होता आणि तो ओलावा आपण समजून घेऊ शकलो नाही याचे दुःख सावीला होते. आम्मीचे वडील आणि सावीचे वडील हे दोघे मित्र होते. त्यातूनच आम्मीला असणाऱ्या ल्युकेमिया या नावाच्या रोगाने ग्रासले आहे. हे पाहिल्यानंतर व आम्मीच्या वडिलांच्या निधनानंतर सावीचे वडील

आपल्या मुलीला सोबत होईल म्हणून आम्मीला घेऊन येतात. डॉक्टरांनी पाच सहा वर्षाचे आयुष्य आम्मीला सांगितलेलं असतं. आपल्या वडिलांनी आम्मीशी लग्न केले नाही तर आपल्या सोबतीसाठी आम्मीला आणले होते हे समजल्यावर तिला अधिकच दुःख होत आम्मीशी आपण किती तुटकपणे वागलो याचाही साक्षात्कार होतो. आम्मीचे शेवटचे उद्गार "चुकतात आडाखे माणसाचे, सावित्री अजून पुष्कळ आयुष्य आहे तुझं पुढे. ये आता" हे उद्गार सावीला कधीही न संपणारं दुःख देऊन जातात. कोरड्या नात्यातही असणारा मायेचा ओलावा सावीला जाणवतो आणि तो दुःखाने आकांत मांडते न बोलताही आम्मी खूप काही करून गेली होती आपल्याच अहंभावात असणारी सावी मात्र वेळीच ते समजू शकली नाही आता आम्मी गेल्यावर मात्र त्या नात्यातला प्रेमाचा पाऊस सावीला दुःख नाहीत चिंब भिजवून गेला.

आंधळ्याच्या गायी' 'हंस अकेला' या कथासंग्रहानी आणि 'नातिचरामि या कादंबरीने मराठी साहित्यात आपल्या लेखनाने स्वतंत्र स्थान निर्माण करणाऱ्या लेखिका मेघना पेठे या आहेत. 'आए कुछ अन्न' ही मेघना पेठे यांची स्त्रियांचा एक वेगळा प्रश्न मांडणारी कथा आहे. या कथेमध्ये उशिरा लग्न होणाऱ्या मुलींचा प्रश्न चर्चिला आहे. आपल्या मनासारखे स्थळ शोधण्यासाठी घरच्यांच्या विरोधाला न जुमानता या कथेची नायिका स्वतंत्र राहते आणि आपला शोध सुरू करते. स्वतंत्र विचाराची तिची मैत्रीण शिरीन आणि पहिलं प्रेम असणारा मोहन तिला सदैव आठवत राहतो. 'आए कुछ अब्र ' ही फैज अहमद फैज यांची गझल आहे. मोहन गझलेचा अर्थ सांगतो अव्र म्हणजे ढग, शराव म्हणजे दारू... अजाब म्हणजे यातना. पापाबद्दल मिळणारी शिक्षा.

मुलगी म्हणजे वडिलांच्या छातीवरील भार आणि तो कधी ना कधी हलका करायचा असतो. मुलीचे लग्न झाल्यावर ती तिच्या आईच्या मनावरील दडपण कमी करते. अण्णा आणि अम्मीला वाटत असते की नायिकेने वेळेतच लग्न करावं याऊलट नायिका जीवनाचे अर्थ लावत असते. अम्मी आणि अण्णा यांच्या लग्नानंतर अम्मीच्या वाट्याला तरी कोणते सुख आले? याचाच विचार ती करत राहते. वेळेत लग्न करणाऱ्या अम्मीला अण्णांनी तिच्यावर वेळोवेळी केलेला अत्याचार वाचून दाखवते. तिचा गळा गोड असतानाही अम्मीला कधी गाणे गाता आले नाही किंबहुना तिच्या घरच्यांनी कधीही त्यासंदर्भात अम्मीच्या मनाचा विचारही केला नाही. भाऊ संजूच्या लग्नात अण्णांनी केलेला पाणउतारा तिने अम्मीला वाचून दाखवला. तिच्या आजारपणाच्या काळात तिला तिच्या भावा घरी नेऊन टाकणारे अण्णा तिला आठवले आणि अम्मीच्या वाट्याला कोणते सुख आले? हाच प्रश्न तिला करत अम्मीला तिने निरुत्तर केलं. तू एकदा आपल्या घरी जा की मी मरायला मोकळी म्हणणाऱ्या अम्मीला तिने तुला किती गुणांची सोबत मिळाली? आणि तुला किती आनंद मिळाला? हे प्रश्न विचारावेत असे नायिकेला वाटते. नायिकेला शिरीनचे विचार आवडतात. स्त्रीला कोणत्याही अन्नात राहणे आवडत नाही म्हणूनच शिरीन म्हणते, हे बघ, ती अडीच तीन इंचाची एरिया म्हणजे मी नव्हे. कसली शुचीता आणि कसलं काय? आनंद घ्यायचा, दुःख भोगायचं. दोन्हीतून मोकळं व्हायचं. आयुष्य आत्मशोधासाठी आहे.कुणाच्या तरी दावणीला बांधून घेऊन आरामात चरत आणि वीत

राहतात उत्या गाई- म्हशी. आपला जन्म यासाठी असावा ? नो. आपण प्रयोग करायला हवेत. तिचा हा स्वतंत्र विचार नायिकेला भावत राहतो. जीवनाला सेक्स म्हणजेच सार काही आहे असंही नायिकेला वाटत नाही. याची जाणीव तिला कन्नमवार सोबतच्या शारीरिक संबंधातून जाणवते. मोहन तिचा झाला नाही. त्याच्यावर असणारं तिचं प्रेम मात्र तिला अखेरपर्यंत सतावत राहते. अम्मीच्या निधनानंतर घरी परतल्यावर घरी अम्मीच्या जाण्यानंतर नित्यक्रम जसाच्या तसाच असतो. कुणाच्याही चेहऱ्यावर दुःखाची संवेदना आलेली नसते. अण्णाही आपल्या खोलीत निवांत पेपर वाचत बसलेले असतात. या साऱ्यातून अम्मी ज्याला आपलं घर मानत होती ते तिच कधीच नव्हतं. या उलट ती आयुष्यभर दुखी आणि इतरांची दुःख आपलीच माणून त्यांच्या दुःखात झटत राहिली, कष्टत राहिली. स्त्रीया ज्याला आपलं म्हणतात तो भ्रम कसा तुटतो याचेही वास्तव या कथेतून लेखिकेने आपणा समोर ठेवले आहे.कुटुंबासाठी आयुष्यभर आपल्या सुखाची राखरांगोळी करणारे स्त्री शेवटी एकटीच असते. तिची दुःखच तिच्यासोबत जातात. बाकी पुरूषप्रधान संस्कृतीमध्ये कुटुंबाचा गाडा ओढणारी ती एक स्त्री असते यापलीकडं तिचं अस्तित्व नसतं. हे वास्तव लेखिकेने आपणासमोर ठेवले आहे. कथेच्या अखेरीस शिरीनने रशीदपासून घेतलेला घटस्फोटही नायिकेला धक्का देणारा ठरतो. रशीद आणि शिरीनच्या जोडीला सुखी संसाराची जोडी मानणाऱ्या नायिकेचा भ्रम शेवटी तुटताना दिसतो. रशीदला का सोडलस ? या प्रश्नावर शिरीन म्हणते, मी ज्या रशीदला आपलं मानलं, त्याला नाही मी सोडलं पण माणसं बदलतात डियर... क्षणाक्षणानं, दिवसागणिक, महिनोन्महिने आपल्या डोळ्यासमोर आपलं माणूस वदलत जातं. एक दिवस असा येतो की समोरचा माणूस ओळखताच येत नाही. आणि ज्याचा हात धरला, ज्याच्यावर विश्वास टाकला, ज्याला वचने दिली, तो माणूस हाच असं म्हणून स्वतःला फसवत जायचं की... Well have made a choice. ( पुरुष फसवतात याची जाणीव तिला होते. आपल्या कल्पनेतच राहिला म्हणूनच मोहन आपल्या आयुष्यात अखेरपर्यंत राहिला. अन्यथा जर तो वास्तवातला पुरुष असता तर निश्चितच मोहनशीही आपला वाद झाला असता. याची जाणीव तिला होते आणि शेवटच्या निळ्या शर्टवाल्याशी करावयाची लग्नाची बोलणीही ती मनातून सोडून देते. स्वच्छंदी राहण्यातच धन्यता मानते एकूणच ही कथा कुटुंबाच्या परंपरागत व्यवस्थेमध्ये मुलींची लग्ने वेळेत झाली पाहिजे तरच त्या सुखी होतात या पारंपरिक मांडणीला छेद देणारी आहे. मुलीनाही स्वतंत्र विचार असावा. त्यांनी त्यांचे स्वतंत्र अस्तित्व सिद्ध करावे अशी नवी मांडणी करणारी ही कथा निश्चितच वाचकांनाही भावते.

लेखिका, सिनेअभिनेत्री आणि वक्त्या अशी प्रतिमा असणाऱ्या एक सशक्त लेखिका म्हणून प्रिया तेंडुलकर यांच्याकडे पाहिले जाते. टीव्हीवरील मालिकांतून घराघरात पोहोचलेल्या प्रिया तेंडुलकर यांनी 'जावे तिच्या वंशा', 'ज्याचा त्याचा प्रश्न यासारखे कथासंग्रह लिहिले. मराठी साहित्यात दमदार लेखन त्यांनी केले आहे. या कथासंग्रहात त्यांच्या 'तिहार' या कथासंग्रहातून 'खेळ मांडियेला' ही कथा आली आहे. या कथेतून लेखिकेने स्त्रियांचा एक नवा प्रश्न वाचकांसमोर मांडला आहे. राजकारणात सक्रिय असणाऱ्या स्त्रिया वरवर समाजाला

पुरुषांच्या बरोबरीने काम करत आहेत असे वाटत असले, तरी पुरुषी मानसिकता राजकारणात त्यांचा वापरच करत असते याचे प्रत्यंतर या कथेतून येते. विरोधी गट असो वा सत्ताधारी गट असो प्रत्येक पक्ष हा आपल्या फायद्यासाठी स्त्रियांचा राजकारणात पद्धतशीरपणे वापर करताना आपल्याला दिसतो. याबरोबरच राजकारणातील किळसवाण्या प्रकाराचे वा केल्या जाणाऱ्या हत्याही स्त्रियांनाच उद्ध्वस्त करून जातात. याचे वास्तव या कथेतून लेखिकेने वाचकांसमोर मांडले आहे.

'खेळ मांडियेला' या कथेची नायिका निवेदिता पवार ही आपल्या आई- वडिलांच्या इच्छेविरुद्ध आपला प्रियकर जयसिंग सोबत लग्न करते. राजकारणात सक्रिय असणारा जयसिंग निवेदिता सोबत काही दिवस चांगला राहतो. पण पुढे राजकारणातील कसब वापरून तो जिंकण्याचा प्रयत्न करत राहतो. राजकारणात जिंकण्यासाठी वेड्यावाकड्या मार्गाचा अवलंब करण्यात त्याला काहीही गैर वाटत नाही. राजकारणात विजय महत्त्वाचा असतो. त्यासाठी प्रसंगी एखाद्याची हत्याही करावी लागली तरी ती करण्याची जयसिंगची तयारी असते. त्याच्या या विजयासाठीच्या असणाऱ्या कल्पना निवेदितातील माणूसपणाला सहन होत नाहीत. यावरून दोघांमध्ये वाद होत राहतात आणि त्यातूनच निवेदिता जयसिंगला सोडून जाते. प्रेमविवाह करून देखिल निवेदिताचा संसार यशस्वी होत नाही, सुखाचा होत नाही. पुढे विरोधकांकडून निवेदीतालाच खासदारकीचा उमेदवार म्हणून सत्ताधारी जयसिंग विरोधात उभे केले जाते. जयसिंगची पत्नी याच एका कॉलिफिकेशनवर निवेदिताला विरोधी गटाने तिकीट देऊन त्याचेच भांडवल केले आहे. स्त्रीला सन्मान देणे व सामर्थ्य देणे हा हेतू नसून जयसिंगला कुचका ठरवण्यासाठी सत्ताधारी पक्षाने निवेदिताची निवड केलेली असते. प्रचारात निवेदीता उसणगावला पोहोचते आणि तिथे आल्यावर तिला कळते की वियमारे नावाच्या विशीतल्या कार्यकर्त्याचा खून झाला आहे. हे सारे किळसवाणे प्रकार जयसिंग विजयासाठी करत असतो हे तिने अनुभवले व पाहिले होत सत्ताधारी पक्षाने देसाईंना निवेदिताचे सेक्रेटरी म्हणून त्यांना सर्व जबाबदारी दिले होती. देसाईंना म्हणूनच या मतदारसंघातील जिव्हाळ्याचे प्रश्न निवेदिताने आपल्या भाषणात घ्यावेत असे वाटत होते. पण राजकारणात नवख्या असणाऱ्या निवेदितात सदा वाघमारेच्या खुनाचा संदर्भ आपल्या मनातील दुःखाशी जोडला. पुरुषी मानसिकतेतून स्त्रियांचे जीवन कसे उद्ध्वस्त होते याचीच वेदना आपल्या भाषणातून प्रखरपणे मांडली. लग्न करून सर्वप्रथम या गावातल्या देवीच्या दर्शनाला मो आले होते, तेव्हा मी नवी नवरी होते. वयाने लहान होते. माझ्या डोळ्यात स्वप्न होती. सर्वसामान्य नवविवाहित वधूच्या डोळ्यात असतात तशी. तुमच्या मुलीच्या सुनांचा डोळ्यात आहेत तीच. मला संसार करायचा होता. चारचौघीसारखा नेटका. सुखाचा. मला माझं घर हवं होतं. पती हवा होता. मुलंबाळ हवी होती. म्हाळसा देवीची मी मनोभावे प्रार्थना केली होती. त्या संध्याकाळी माझ्या पतीला दीर्घायुष्य मागितलं होतं मी तिच्याकडे, ज्याचा खून झालाय त्या सदा वाघमारेच्या पत्नीनेही कधीतरी या गावात असाच नवी नवरी म्हणून प्रवेश केला असेल.सर्वसामान्य स्त्रियांच्या संसाराविषयी असणाऱ्या कल्पना आणि त्यांच्या सुखाची असणारी स्वप्न लेखिकेने मोजक्या शब्दात मांडली

आहेत. पण ही छोटी छोटी स्वप्नेदेखील पुरुषी अहंकारापोटी उद्ध्वस्त होतात. एखादा पुरुष फक्त आपल्याच पत्नीचे आयुष्य उद्ध्वस्त करत नाही तर आणखी काही स्त्रियांचेही संसार कसे उद्ध्वस्त करतो हे सांगताना निवेदिता म्हणते, सदा वाघमारेच्या पत्नीने माळसादेवीकडे तिच्या नवऱ्यासाठी दीर्घायुष्य मागितले असेल. ती हो माझ्यासारखीच. पण आज तिचा संसार उद्ध्वस्त झाला माझ्यासारखाच. आमची दोघींची घरे उध्वस्त व्हायची कारणं वेगळी असली, तरी नवरा जिवंत असूनही माझं सौभाग्य संपून गेलं आणि सदा वाघमारे यांच्या पत्नीचे सौभाग्य संपवल गेलं. एकाच नियतीच्या दोन टोकांना आम्ही दोघी आज लोंबकळत आहोत. निवेदिताला हेच सांगायचे आहे की आपला नवरा जिवंत असूनही त्याचं जिवंत असणे आपल्या दृष्टीने व समाजाच्या दृष्टीने घातक बनले आहे. सदा वाघमारेच्या पत्नीच्या जीवनातही अंधार त्यानेच निर्माण केला आहे. एकूणच काय तर राजकारणासाठी स्त्रियांचा फक्त वापरच केला जातो. त्यामध्ये स्त्रियांच्या भावना, त्यांचे करिअर यापेक्षाही पुरुषी स्वार्थ हाच महत्वाचा असतो हेच सूत्र या कथेच्या केंद्रस्थानी आहे.

मराठी स्त्रीवादी कथा लेखिका म्हणून आपल्या लेखणीचा स्वतंत्र ठसा उमटवणाऱ्या लेखिका म्हणजे सानिया होत. त्यांच्या कथा या नेहमीच वाचकांना भावताना दिसतात. त्यांचे प्रयान, भूमिका, अशी वेळ, ओमियागे, ओळख, खिडक्या, दिशा घरांच्या, परिणाम, प्रतीती असे अनेक कथासंग्रह प्रकाशित आहेत. मुलगी आणि आई यांच्यातील नातेसंबंध, स्त्रियांना पुरुषप्रधान संस्कृतीत मिळणारे दुय्यम महत्त्व, स्त्रियांना कुटुंबात नसणारे महत्त्व आणि त्यामुळे तिची होणारी फरफट हे त्यांच्या कथांचे विषय आहेत. 'अशी वेळ' या कथासंग्रहातील दुष्काळ' ही कथा या कथासंग्रहामध्ये आली आहे. 'अशी वेळ' या कथेतील नायिकेला लग्नाअगोदरच तिचा होणारा पती त्याच्या छोट्याशा दोन खोलींच्या घरामध्ये घेऊन जातो. तो तिला सांगतो की हे आपलं घर आहे. आपल्या नव्या घरात आपण जाणार या कल्पनेनंच ती मोहरून जाते. तिचा आनंद तिच्या कुटुंबीयांनाही जाणवत राहतो. काही दिवसातच त्यांचं लग्न होतं आणि सुट्टी संपवून त्या घरांमध्ये ती नवीनच राहायला जाते. त्या घरामध्ये त्यांचा संसार सुरू होतो. आपण मोठं घर लवकरच घेणार आहोत हे ही तो तिला सांगतो. या नव्या घरासाठी तिच्या माहेरहून आपण काहीही घेणार नाही हा त्याचा विचारही तिला खूपच भावतो. घरातला गळणारा नळ मात्र तिला अस्वस्थ करत राहतो. तो दुरुस्त व्हावा ही इच्छा ती त्याच्याकडे वोलून दाखवते. पण त्याला यात फारसं स्वारस्य राहिलेलं नसतं. या नळाची दुरुस्ती सहज होते तो फक्त घट्ट आवळला तर ठिबकणारे पाणी थांबते, हे सत्य ती त्याच्या निदर्शनास आणून देते. पण तो मात्र त्याकडे दुर्लक्ष करत राहतो. तिचं वारंवार नळाविषयीचं बोलणं त्याला मात्र ती मुद्दामच आपल्याला खिजवत आहे असं वाटत राहतं. त्यातूनच दोघात खटके उडत राहतात. कृषिप्रधान संस्कृतीत पुरुषाच्या विचारालाच महत्त्व दिले जाते. याउलट स्त्रियांच्या लहानसहान तक्रारी ऐकून घेतल्या जात नाहीत. ज्या कुटुंबाच्या आणि समाजाच्याही फायद्याच्या असतात. आत्ता तिच्याकडे राहायला आलेली तिची आईही तिलाच समजून सांगते. तो नळ बंद करण्याची जबाबदारी ही पूर्णतः तुझी आहे. पुरुष आपल्या मनाप्रमाणे वागतात.

ती एका प्लंबरला आणून तो नळ दुरुस्त करण्याचा प्रयत्न करते पण त्यालाही यश येत नाही. महागडे घर घेऊन त्याचे हप्ते भरत राहण्याची नायिकेची मानसिकता दिसते.या मानसिकतेतून ती त्याच्या नव्या प्रस्तावाला नकार देते त्या वेळी मात्र तो रागावतो.तिने पुन्हा नळ पुराण सुरू केल्यावर रागावून तो तिला म्हणतो. ह नळाचा प्रश्न नाहीच आहे. तुझ्या वेडसरपणाचा आहे तुझ्याबरोबर आयुष्य काढणं मला कठीण आहे. त्याच्या त्या उत्तराने ती अवाक होते. तो त्याच्याकडे पाहतच राहते. तो टपटपणारा नळ पुन्हा तिला अस्वस्थ करत राहतो.तो बंद करते आणि मग तिच्या मनात न राहून विचार येतात स्वतःशीच म्हणाली की हे माझं घर आहे? जिथं असं थेंबा थेंबानं पाणी गळायचं थांबणारच नाही. तिथं मला कसं राहता येईल? विशेषतः उन्हाळ्यात, दुष्काळाच्या बातम्या रोज पेपरला येत असताना ते कसं शक्य होईल?, तिने वळून तिच्या नवऱ्याकडे पाहिलं.आता तो तितका अनोळखीचा वाटला नाही ओळखीच्या माणसाबाबत काही करता येणं तिला आता शक्य वाटलं. कदाचित अधिक हट्टीपणाने काही म्हणत राहणं किंवा त्याला सोडून देणं हा शक्याशक्यतेचा विचार तिच्या मनात येऊन गेला. जिथं आपलं असं आपल्याला स्थानच नाही ते घर आपलं म्हणावं तरी कसं? असा प्रश्न वाचकांना ही अस्वस्थ करणारा आहे हा कधीही न बंद होणारा आणि ठिबकणारा नळ म्हणजेच स्त्री मनातील दुःख आणि तिच्या डोळ्यावाटे पाझरणारे अश्रूच आहेत. परंपरागत व्यवस्थेने स्त्रियांच्या माथी पाणी भरणे लागलेलेच दिसते म्हणूनच एके ठिकाणी ती म्हणते देशभरात चारी दिशांच्या प्रदेशात सगळीकडे पाणी आणणाऱ्या, भरून ठेवणाऱ्या बायका वर त्यावर रचलेली गाणी आणि बायांचे भरले घडे फोडून केलेली, छेडाछेडदेखील. पाणी भरण्याचे वास्तव अस्वस्थ करणारे आहे. पुरुषांनी पाणी भरण्याचे काम नाही केलं. ते स्त्रियांचेच काम आहे. हा पुरुषी अहंकार आपणास दिसतो. स्त्रियांनी या परंपरागत व्यवस्थेने लादलेल्या कामाच्या जोखडातून मुक्त होण्याचा प्रयत्न केल्यास पुरुषी अहंकार आणि समाजमन तिलाच दोष देताना दिसते. हे वास्तव लेखिकेने अधोरेखित केले आहे. स्त्री मनातील दुःख दृश्य अदृश्य स्वरूपात तिच्या मनात दिसते. सुखाचा दुष्काळ सदैव तिच्याच वाट्याला येतो.

'आयदान' या आत्मकथनाद्वारे महाराष्ट्र  आणि महाराष्ट्राबाहेर पोहोचलेल्या लेखिका म्हणून उर्मिला पवार यांची ओळख आहे. त्यांचे 'सहावे बोट' 'चौथी भिंत' 'हातचा एक' यासारखे कथासंग्रह प्रकाशित आहेत. मराठीतील सिद्धहस्त लेखिका म्हणूनही त्यांची ओळख आहे. 'हातचा एक' या कथासंग्रहातील सुटे गिराण ही कथा या कथासंग्रहात अभ्यासाला असून स्त्रियांच्या संदर्भातील आणखी एका नव्या प्रश्नाची मांडणी लेखिकेने या कथेतून केलेली दिसून येते. या कथेची नायिका सुमती सबनीस ही बुटकी आहे. तिची उंची अपेक्षित झाली नसल्याने घरापासून समाजातील सगळ्यांच व्यक्तींकडून सुमतीला याविषयीचे टोमणे ऐकून घ्यावे लागतात. अठरा वर्षापर्यंत आपली उंची वाढेल असे स्वप्न मनात बाळगून तो प्रयत्न करत राहते. पण अठरा वर्षानंतर मात्र तिच्या या स्वप्नाचा चुराडा होत जाताना तिला दिसून येतो. तिला पाहायला आलेले पाहुणेही तिच्यापेक्षा लहान असणारी बहीण कुंदाला पसंती दर्शवतात. त्यांचा कुंदाशीच विवाह होतो.तिच्या बुटकेपणामुळे तिचे आयुष्यही खुरटे बनले आहे.नोकरीच्या

इंटरव्यूसाठी गेल्यावर तिच्या उंची वरूनच तिला नाकारण्याचा प्रयत्न होतो. त्यावेळी सुरेश मुरुगकर नावाचा तरुण तिचे समर्थन करतो. तिला नोकरी प्राप्त होते. या सुरेशचाही एक हात नसल्याने, त्याचा एक हात प्लास्टिकचा आहे. त्याने सुमतीची बाजू घेतल्यामुळे सुमतीलाही त्याच्याविषयी आत्मीयता वाटते. त्याचे अपुरेपण आणि आपले अपुरेपण यामुळे आपले जीवन परिपूर्ण होईल असा आशावाद तिच्या मनामध्ये जागृत होतो. तिच्या मनात सुरेशविषयी प्रेमाची ओढ सुरू होते. सुरेशच्या रूमवर दोघेही एकांतात भेटल्यानंतर तो अनुभव आयुष्याला चोळामोळा करणारा.तरीही पुन्हा चव घेण्याची आस मागे ठेवणारा. त्यानंतर मात्र सुरेश तिच्याशी तुटक वागायला सुरू करतो. सुमती राहिलेल्या ठिकाणी आंटीने मुलींना व्यापारी दृष्टिकोनातून राहायला दिलेली जागा असते. तेथे मुली गरज म्हणूनच राहत होत्या. तेथील मुलींच्याकडून सुमीची होणारी छळवणूक, तेथील अंकलचे मुलींसमोर बेशरमपणे वावरणे या साऱ्याच गोष्टीचा सुमीलाही त्रास होत होता. आपल्या मर्यादांची जाणीव असल्यामुळेच ती नाईलाजाने तेथे राहत होती. ग्रहण सुरू होणार होते म्हणून सारेच ते पाहण्याच्या धावपळीत असतानाच सुमतीने सुरेशला लग्नासंबंधी विचारले. तिला सुरेशकडून होकाराची अपेक्षा होती. पण सुरेशने तिला स्पष्ट सांगितले की मला आणखी अपूर्णता नकोय. प्लीज डॉट बी अपसेट. वट यू आर नॉट सेक्शुली ट्रॅक्टिव्ह.... ओ यस... अँड आयम आल्सो नॉट! त्याने सुमतीला स्पष्टच नकार दिला आणि सुमतीने रंगवलेल्या स्वप्नाचा चुराडा झाला. ती त्याच टेन्शनमध्ये घरी आली. रूमवर ग्रहण पाहण्यासाठी मुलींची धावपळ सुरू होती. त्यापासून ती स्वतःला दूर ठेवू इच्छित होती. या साऱ्या मनात चाललेल्या विचाराच्या गोंधळात ती व्हेंटिलेटरमध्ये कधी घुसली हे तिच्याही लक्षात आले नाही. त्याच वेळी इतरांकडून तिच्यावर अनेक आरोप लावले गेले. आंटीला तर तो अंकलला भेटायला जात असल्याचा संशय बळावला. पुन्हा एकदा तिच्या अब्रूचे धिडवडे सुरू झाले. आयुष्यभर वाट्याला आलेले बुटकेपार आणि त्यातून तिच्यावर केली जाणारी विकृत टीकाटिप्पणी या साऱ्याच गोष्टी तिला आता असह्य झाल्या. तिच्या मनातल्या वेदनांना मनातल्या मनात वाट करून दिली तिच्या मनात विचार सुरू झाला माझी व्यथा तुम्हाला नाही कळणार. ही व्यथा लहानपणापासून माझ्याबरोबरच वाढतेय. तो तुमच्याच टिंगल. टवाळीवर पोसतेय. माझी टवाळी करण्यात विकृत आनंद अनुभवताय. मो खुर्चीवर बसले तर पाय जमिनीला टेकत नाही. उंचावर हात पोहचत नाही, म्हणून तुम्ही हसणार खुज्या देहात मनही खुजं असतं अशी मूर्ख शेरेबाजी करणार. मला टाळणार माझ्याशी बोलणं वागणं तुम्हाला कमीपणाचं वाटणार. या देहात तुमच्यासारखंच मन आहे. ते जखमी होतं, मरतं, हे सोयीस्करपणानं विसरणार आपल्यालाही मन आहे. आसपासच्या लोकांनी केलेल्या शेरेबाजीतून आपलंही मन दुखावलं जातं. पण त्यातूनही विकृत आनंद या लोकांना मिळतो याचंही दुःख सुमतीला मनोमन वाटतं. त्याही पुढे जाऊन सुरेशने तिच्यावर केलेलो शेरेबाजी तिच्या मनाला अधिकच लागली आहे. म्हणूनच ती म्हणते स्त्रीदेह सुंदर नसला तरी चालेल पण भरपूर हवा, पुष्कळ हवा तरच तो सेक्शुलो अक्टिव्ह वाटतो. मात्र बलात्कारासाठी लहान मुलगीही चालते. लग्नासाठी मात्र परिपूर्ण स्त्री हवी हा पुरुषी दृष्टिकोण स्त्रियांच्या वर अन्याय

करणारा आहे. न कळत्या वयापासून मनातले हे विचार चक्र सुरूच राहिले. अजाणतेपणापासून तिला लोकांच्याकडून व घरच्यांकडूनही त्रास होत राहिला. लोकांकडून तिची केली जाणारी ही छळवणूक यामुळे ती मनोमन खचली होती. त्यातच सुरेशच्या आघाताने ती अधिकच विव्हळ बनली.

ग्रहण हे काही काळासाठी लागते आणि काही वेळातच ते संपते. पण इथे सुमतीच्या जीवनाला लागलेले ग्रहण मात्र तिच्या अखेरच्या श्वासापर्यंत तिचा पिच्छा पुरवते की काय? अशी स्थिती निर्माण झाल्याने हे न सुटणारे ग्रहण आहे असेच लेखिकेला शीर्षकातूनच सुचवायचे आहे. असाही एक विचार वाचकांच्या मनात येतो. स्त्रियांच्या बाबतीत उंची हा घटक किती त्रासदायक ठरतो. याचेच उत्तम उदाहरण ही कथा आहे. पुरुषाच्या उंचीवर टीकाटिप्पणी करताना कोणी दिसत नाही, पण स्त्रिया मात्र उंचीने कमी असल्यास त्यांची स्वप्ने कशी उद्ध्वस्त होत जातात, क्षणाक्षणाला त्यांच्यावर वेदनांचे आसूड कसे ओढले जातात याचेच प्रत्यंतर या कथेतून लेखिकेने वाचकांना घडवले आहे.

मराठीतील आघाडीच्या लेखिका आणि कवयित्री म्हणून नीरजा यांना ओळखले जाते. ओल हरवलेली माती, जे दर्पणी विंबले, पावसात सूर्य शोधणारी माणसं हे त्यांचे कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. पावसात सूर्य शोधणारी माणस यो कथासंग्रहातील 'महिषासुरमर्दिनी' हो नीरजा यांची कथा पत्नी आणि पती यांच्या नात्यावर भाष्य करणारी आहे. आजही असंख्य स्त्रिया आपल्या पतीला सौभाग्याचे लेपणे म्हणून सांभाळताना दिसतात. या कथेची नायिका सती ही स्वतःला सदैव महिषासुरमर्दिनीच्या रूपामध्ये पाहत असते. महिषासुरमर्दिनीला जसे जसे दहा हात आहेत तसे आपल्याला दहा हात असावेत असं स्वप्नरंजन करणारी ही नायिका आहे. तिचे वडील शिवभक्त होते म्हणूनच त्यांनी आपल्या मुलींची नावे पार्वती, सती, गिरिजा, उमा आणि गौरी अशी ठेवली होती. मूळचाच शिवभक्त असणाऱ्या पित्याने आपल्या मुली देताना ही कफल्लक आणि गोसावी यासारख्या फिरणाऱ्या लोकांनाच त्या दिल्या होत्या. त्यामुळे मुलींचे संसारही कष्टप्रद असे बनले होते. सती आणि तिचा पती विश्राम या दोघांच्या नावाप्रमाणेच दोघांचीही दोन दिशेला तोंडे होती. सती ही थोडीशी स्वप्नरंजन करणारी तर याउलट विश्राम हा नावाप्रमाणेच सदैव विश्राम करणारा. आळशी पती तिच्या वाट्याला आला होता. लग्न करताना मुंबईच्या गिरणीत मुकादम म्हणून काम करणारा हा पती गिरण्या बंद पडताच बेकार झाला. पत्नीच्या डोक्यावर भार झाला. सती आपले कुटुंब पोळ्या लाटून त्यातून मिळणाऱ्या पैशावर चालवत होती. याउलट विश्राम त्या पोळ्या पोच करणेही स्वतःला खूप कष्टाचे काम करतो आहे असेच भासवत होता. सतीची इच्छा सँडविचची गाडी टाकण्याची होती पण विश्रामने तिच्या या कल्पनेला अजिबात पाठिंबा दिलेला नव्हता. खरं तर बाजूच्या चाळीतल्या विजयासारखी सँडविचची गाडी टाकायची होती. तिला त्रास कमी, कमाईही बरी आणि मुख्य म्हणजे घराबाहेर पडून रस्त्याच्या बाजूला उभे राहून व्यवसाय करायचा असल्याने नीटनेटकी साडी असून, वेणीफणी करून फुलबिलं माळून, छान प्रसन्न आणि सुगंधी होऊन सँडविच विकण्याचा आनंदही मिळवता आला असता तिला। विश्राम मनावर घेत

नव्हता. त्यामुळे पोळ्या लाटणेच तिच्या नशिबाला आले होते. विश्राम सोबत सतीला मनासारखा संसारही करता येत नव्हता. त्यांच्या संसारवेलीवर दोन फुले फुलली असली तरी विश्रामशी संसार करण्यात तिला गोडी राहिली नव्हती. विश्रामही व्यसनांच्या अधीन झाला होता. नोकरी गेल्यावर पान विडीसोबतच त्याने दारूती सुरू केली होती सारखी विडीय हाती कमकुवत झाली होती. त्या बरोबरच लिव्हरी खराब झाले होतेयाणा पोटाचा डोल झाला होता. या त्याच्या आजारपणामुळे पतीला मिळवलेला या त्याच्या दवाखान्यावर खर्च करावा लागत होता. त्यामुळेच पती आप व्याच्चालाही विटली होती. आपल्या जीवनात सुख निर्माण करायचे अयेत अ चरातील ब्लॅक अॅण्ड व्हाइट रोव्ही प्रमाणेच आपला नवराही एक्चेंज के पाहिजे असे सतीला वाटते. तिच्या मनात येणारी कल्पना स्त्रियांच्या स्वत विचाराकडे घेऊन जाणारी आहे. सतीला आपल्या अंगात महिषायुष्मटिक संचारल्याचा भास होत असतो. आपण दहा हातांनी पोळ्ळ्या लाटत आहोत. त्या दहा हातातील एका हातात महिषासुरमर्दिनीप्रमाणे एक पुरुषाचे मुंडके पडले आहे पण ते नेमके कोणत्या पुरुषाचे हा विचार तिच्या मनात सदैव येत असतो हाव विचार सत्यात येताना तिला दिसतो तिच्या पतीला पोळ्या द्यायला गेल्यावर एक ट्रक येवून घडवून जातो. त्यात विश्रामचे निधन होते. पतीनिधनानंतरच्या समाजप्रथा पाळताना स्त्रियांच्या मनातील वास्तव आणि समाजाकडून तिला मिळणावा वागणुकीचे दर्शन घडते, पतीनिधनानंतर सतीच्या मनात आनंद असूनही ती दुःख व्यक्त करताना दिसते. विश्राम मेल्याशिवाय आपले आयुष्य रंगीत बनणार नाही असे वाटणाऱ्या सतीला विश्रामच्या जाण्यानंतर ही आपले आयुष्य कसे बेरग होत चालले आहे याचे वास्तव अस्वस्थ करताना दिसते. विश्रामच्या प्रेताचा पंचनामा होऊन त्याच्यावर अंतिम संस्कार होताना सर्व परंपरेप्रमाणे केले जाते. सतीच्या हातात हिरवा चुडा भरून जोडवी काढली जातात, कुंकू पुसले जाते हे सारे सतीला अस्वस्थ करणारे आहे. म्हणूनच सती म्हणते, नवऱ्याबरोबर मिळालेला हा सारा ऐवज असा त्याच्या मरणानंतर त्याला परत करण्याची हो प्रथा, का कुणास ठाऊक पण सतीला अजिबात आवडली नाही. सतीचा रंगिन स्वप्नांना या साऱ्या प्रसंगाने बेरंगीण व्हावे लागते. सतीच्या अंतर्मनात चाललेला कोलाहल लेखिकेने रेखाटलेला आहे. एक पैसा खर्च केला नाही ह्या माणसाने आपल्या बांगड्यांवर, पावडर - कुंकूवावर, जोडव्यावर की गजऱ्यावर. मंगळसूत्र तेवढं त्यांनं केलं होतं. पण म्हणून काय तेही काढायचं. त्या काळ्या मण्यांच्या मंगळसूत्रासाठी तयार झाली ती लग्नाला ह्या अशा सुस्त मुर्दाड माणसाशी कोणत्याही वेळी त्याचं अंगावर चढणं सहन केलं आणि आता तेच नाही घालता येणार आपल्याला. सतीला रडू आलं, मंगळसूत्राशिवाय, कुंकूवाशिवाय, फुलांशिवाय राहण्याच्या कल्पनेन, नवरा नकोच होता तिला पण नवरा गेला काय गमवाव लागत याची जाणिव होऊ लागली.

समाजाच्या रुढी परंपरेने स्त्रीला कसे जखडून ठेवले आहे याचेच वास्तव दर्शन सतीच्या या निवेदनातून होते. स्त्रिया आपल्या पतीला असहाय्यपणे सहन करत असतात, मनातील दुःख भाव बाजूला सारून त्या पतीला सांभाळण्याचे काम करतात. कारण तिला समाजात नटता, सजता येते. पती जिवंत असेल तरच स्त्रियांना आपल्या सौभाग्याच्या खुणा मिरवता

येतात. दुर्दैवाने स्त्रियांना पती जिवंत असताना मनासारखा साजशृंगार करता येत नाही तर तो मेल्यानंतरही रुढी परंपरेच्या जोखडामुळे स्त्रियांना मनासारखे नटता येत नाही. त्यांच्या मनातील दवल्या गेलेल्या भावभावनांप्रमाणे जगता येत नाही. हे दुःख या कथेतून प्रकट होते. पतीनिधनानंतर समाज जणू तिला अस्तित्वहीनच करून टाकताना दिसतो. याउलट पुरुषांना मात्र अशा कोणत्याही बदलाला सामोरे जावे लागत नाही. हे वास्तव येथे अधोरेखित होते. सतीच्या माध्यमातून पतीला परमेश्वर मानून त्याच्या मेवेत रत राहण्यापेक्षा आपल्या मनातील इच्छा, आशा, अपेक्षा पूर्ण करणे आणि त्यासाठी झगडत राहणे हा स्त्री स्वभाव असायला हवा. त्याप्रमाणेच स्त्रियांनी आपल्या स्वप्नांसाठी जगले पाहिजे. ती पुरी करण्यासाठी धडपडले पाहिजे हा आशावाद लेखिकेने या कथेच्या माध्यमातून वाचकांसमोर ठेवला आहे.

प्रज्ञा दया पवार या मराठीतील स्त्रीवादी लेखिका आहेत. त्यांनी मराठी साहित्यात मोठ्या प्रमाणात लेखन केले आहे. कवितासंग्रह, ललित लेखन, नाटक, कथासंग्रह असे त्यांचे मोठे लेखन आहे. 'अफवा खरी ठरावी म्हणून' हा त्यांचा कथासंग्रह प्रसिद्ध आहे. या कथासंग्रहात 'आईच्या नावानं' ही त्यांची कथा आली असून मुलीला न सांगता आईने आयुष्यभर भोगलेल्या जीवनाची व्यथा या कथेतून लेखिकेने मांडली आहे. या कथेची नायिका स्मिता बँकेत कामाला आहे. नऊ महिन्यापूर्वीच तिच्या आईचे निधन झाले आहे. ही नायिका स्वच्छंदी राहणे पसंत करणारी आहे. तुषार हा तिचा जिवाभावाचा एकमेव मित्र आहे. तुषारनेही स्मिता आपल्याशी लग्न करेल म्हणून काही दिवस वाट पाहिली आणि शेवटी त्याने आपल्या चुलत मामे बहिणीशी लग्न केले. स्मिताचे वडील लहानपणीच वारल्याने तिच्या शिक्षणाची आणि पालनपोषणाची जबाबदारी आईने घेऊन तिला खूप चांगल्या पद्धतीने शिकवले. स्मिताही पुढे बँकेत नोकरीस लागली. काही दिवस पुण्याला नोकरी केल्यानंतर ठाण्यात तिची बदली झाली. तोपर्यंत आईचे निधन झाले होते संगिनी हॉटेलात आई रिसेप्शनिस्ट म्हणून काम करते हे तिने आईकडून ऐकले होते ठाण्यात आल्यावर आईच्या आठवणींना उजाळा द्यावा म्हणून तिने सांगितलेल्या हॉटेलमध्ये जावे ही तिच्या मनात ओढ होती. तिला चेत्रईहत इंटर्नल इन्स्पेक्शनसाठी आलेल्या आयरमॅडमची राहण्या-खाण्याची व्यवस्था करण्याची जबाबदारी तिच्यावर होती. आयर मॅडममुळे संगिनी हॉटेलमध्ये तो गेली. तिथे तिने आपली आई या हॉटेलात रिसेप्शनिस्ट म्हणून काम करत होती याचा उल्लेख तेथील मॅनेजरजवळ केला. पण तेथील मॅनेजरने अशी कोणतीही स्त्री येथे रिसेप्शनिस्ट म्हणून राहिली नव्हती याची खात्री दिली. शेवटी मालकाला भेटण्याचे तिने ठरवले. ती रिसेप्शनिस्ट नव्हती तर तीलोत्तमा वर्गीस या नावाने याठिकाणी वेट्रेस म्हणून काम करत होती असे सांगितले. तिला या गोष्टीचा मात्र खूपच धक्का बसला. आपल्याला उभे करण्यासाठी आपल्या आईने आपल्या उभ्या आयुष्याची राखरांगोळी केली. आयुष्यभर तिने किती भोगले असेल? किती सहन केले असेल ? ती या सगळ्या गोष्टीला कशी तयार झाली असेल? या साऱ्याच गोष्टीची प्रचंड वेदना स्मिताच्या मनावरती उमटते. ती आईवर खूप नाराज होते आणि आईने भोगलेल्या वेदनांमुळे व्याकुळही होते. शेवटी आईने जे भोगले ते आपण एका रात्रीसाठी का असेना अनुभवावे या

भूमिकेतूनच ती चौहानसोबत एक रात्र काढते. आईने आपल्याला सर्व सुख सुविधा उपलब्ध करून दिल्या मात्र ती या दलदलीत राहिली याची खंत स्मिताला राहून राहून वाटते. आईने भोगलेले दुःख एका रात्रीसाठी का असेना पण ती स्वतः भोगते आणि नव्या जीवनाची सुरुवात करण्यास बाहेर पडते. मुलीला घडवण्यासाठी मनाविरुद्ध जगूनही त्याचा कधी अस्पष्टसा उल्लेखही न करणारी आई तर आईने काय भोगले हे समजून घेण्यासाठी तो प्रत्यक्ष अनुभव घेणारी मुलगी वाचकांनाही अस्वस्थ करून सोडते.

मराठीतील नामांकित लेखिका आणि समीक्षक म्हणून ज्यांच्याकडे पाहिले जाते त्या वंदना महाजन यांची 'निर्वाणाची स्वगते' ही कथा या कथासंग्रहात आली आहे. अजिंठ्यातील गूढ गंभीर लेण्यांचा अर्थ मानवी जीवनातील अनुभूतीशी लावण्याचा प्रयत्न करतच लेखिकेने ही कथा उलगडली आहे. अर्पिता ही लेणी पाहण्यासाठी गेली आहे. तिथे लेण्यांच्या चित्रांची माहिती सांगणारे गाईड एका लेण्याची माहिती सांगण्यासाठी दोनशे रुपये असा आपला दर सांगतात. अशावेळी तिला लेण्याची माहिती सांगणाऱ्यांच्या डोक्यातील इतिहास हा खरा आहे की यावी  कल्पना ? असा प्रश्न पडतो. मग तिच्या मनात विचार येतो की, तथागत तर असा सरळ सरळ आहे. अनेक शतकांचा प्रवास करत. आजही तसाच त्याहाव उभा राहतो माझ्यासमोर माझा प्रियतम सखा असल्यासारखा. संपूर्ण माणूस व्यावर कोणतेही कृत्रिम पुरुषत्व किंवा स्त्रीत्व आरुढ होऊ शकत नाही तो कपोच लिंगभेदापलिकडे पोहोचला होता. ज्यात फक्त संपूर्ण मनुष्यत्व भरून आलेल होत. म्हणूनच तो जगाला सांगू शकला, करुणा, प्रेम, मैत्री आणि मुदिता अर्थात स्त्रोत्व आणि पुरुषत्व या आपल्या पारंपरिक धारणा पिढ्यान्पिढ्या बालत आलेल्या. वाईकडेही कितीतरी अधिक शक्यता असतात बुद्धत्वाच्या, पण त्या कुंठित झालेल्या आहेत यशोधरेपासून आजपर्यंतचा इतिहास हेच सांगतोय. बाईपणाची कातडीला चिकटलेली वस्त्रे फेकूनच देता येत नाहीत सहजतेने. सगळ झुगारून चालता येत नाही तथागतासारखं वाट फुटेल तिकडे.हा अर्पिताच्या मनातला विचार स्त्री सामर्थ्याची ओळख करून देणारा आहे. स्त्री. पत्नी, आई, मुलगी अशा अनेक जबाबदाऱ्यात गुंतून पडते. त्यामुळेच तिचा उद्धार तिला करता येत नाही. हा विचार सुरू असतानाच ती आठव्या लेण्याजवळ एक स्त्री पाहते. या लेण्यांची माहिती सांगत आहे ती. एकाच ठिकाणी बसून आणि ऐकनारा देईल ते मूल्य स्वीकारून तिने माहिती सांगण्यास सुरुवात केली. दुसऱ्या शतकापासून ते अठराव्या शतकापर्यंत ती सारी माहिती अर्पिताला सांगू लागली. ती बुद्धाच्या कथा सांगता सांगताच कधी स्वतःच्या जीवनात शिरली हे अर्पितालाही कळले नाही. नर्मदा ही अजिंठ्यापासून वीस किलोमीटरवर असणाऱ्या रावची. ते तिचे सासर होते. नर्मदाच्या वडिलांना चार अपत्ये होती तर दोन एकर कोरडवाहू जमीन घरी होती. घरी दारिद्र्य कायमचेच होते. त्यातूनच वडिलांनी नमंदाला फारसे शिकू दिले नाही. आठ दिवसातच तिची शाळा बंद झाली आणि भावंडांना सांभाळण्याची जवाबदारी ती करू लागली. पुढे नर्मदाचे वय पंधरा वर्षे झाले असताना नर्मदाचे लग्न लावून देण्यात आले. तेही एका विदुराशी. त्याची आधीच तीन मुले आणि दोन लहान भावंडे होती. त्याच्या घरची परिस्थिती वरी होती पण दुर्दैवाने नर्मदाला तिथेही

मोलकरणीसारखेच काम करावे लागले. चानू, सासरा, नवरा, दोन नवऱ्याची भावंडे आणि तीन पहिल्या सवतीची मुले या सगळ्यांचे संगोपन आणि या सगळ्यांनाच हवे नको ते बघण्याची सारी बबाबदारी नर्मदेवर होती. याउलट शेतीकडे जाऊन शेतातील काम तिला करावे नागत होते. त्यामुळे खेळण्या-बागडण्याच्या वयातच तिला अकाली प्रौढत्व प्राप्त झाले होते. सकाळी चार वाजल्यापासून रात्री दहा अकरापर्यंत कष्टाचा तिच्यावर पार पडला होता. त्यातच पतीकडूनही तिची छळवणूक होत असे. तिच्या नव्याने आधीच तरवले होते की अगोदरच तीन मुले असल्याने त्याला पुन्हा अपत्य नको होते. त्यामुळेच पाच वर्षात तीन वेळा तिचा गर्भपात झाला या साच्याच गोष्टीने आणि एकूणच घरातल्या वातावरणाने नर्मदा कंटाळलेले होती. शेक्टी तिने घराबाहेर पडण्याचा निर्णय घेतला हा निर्णयही तिच्या सासुः सासर्यांना, नवऱ्याला आवडला नाही तिला प्रचंड मारहाण करून घरातून हाकलून देण्यात आले. नर्मदा अजिंठ्धाला येऊन पोहोचली. तिथेच हॉटेलात राहून हो पोळ्या लाटण्याचे काम करू लागली. तिथल्या जवळच्या डोंगरावर झोपडीत राहू लागली. पुढे हेच काम झेपेना असे झाल्यावर ती या लेण्यातील प्रत्येक चित्राचा अर्थ शोधू लागली. त्यातूनच तिला बुद्धाचे तत्त्वज्ञान समजत गेले. मग तिने पर्यटकांना बुद्ध कथा सांगायला सुरुवात केली. त्यातच तिला जगण्याचा सूर गवसला. सर्व ऐहिक भोगांचा त्याग करून सत्याच्या शोधात निघालेला सिद्धार्थ बोधिसत्व बनला. त्याच्या या प्रकाशमान प्रवासातील किती तरी वाटा नर्मदा धुंडाळू लागली आयुष्य तीला नव्या पद्धतीने आकळू लागलं. तिला तिच्या कष्टाचा विसर पडला. जवळच्या सगळ्याच माणसांनी तिच्यावर जे अमर्याद कष्ट लादले तेही ती विसरून गेली. अजिंठ्याच्या पर्वतरांगांमध्ये तिच्यातील स्त्री मुक्त होण्यासाठी धडपडू लागली.

बुद्धाचे तत्त्वज्ञान सोडल्यास साऱ्याच धर्म जातीत स्त्रीला दुय्यमत्व आहे. त्यातूनच तिच्यावर असह्य जगणे लादले जाते परंपरागत व्यवस्थेत स्त्री दुय्यम राहिल्यानेच तिची ही मूक संवेदना ती सहन करत राहते. शेवटी नाईलाज झाला तर ती बाहेर पडण्याची वाट शोधते. पण तिला बाहेर पडण्यासाठीच्या वाटाहो बंद केल्या जातात व तिची पुन्हा छळवणूक केली जाते. त्यातूनच नर्मदेसारखों एखादी स्त्री धाडसाने जगण्याचा आपला मार्ग शोधते. बुद्धाचे तत्वज्ञान समजून घेते आणि स्वतःला सिद्ध करते. हेच या कथेचे मध्यवर्ती सूत्र लेखिकेने ठेवले आहे. संघर्ष हा स्त्रीच्या वाट्याला सदैव असून या संघर्षात ती होरपळून निघते तिचे व्यक्तिमत्त्व सिद्ध करण्यासाठी तिने परंपरागत रूढ चौकटीतून बाहेर पडले पाहिजे. तरच नर्मदेसारखा जीवनाचा अर्थ शोधता येईल असे लेखिकेस वाटते. नर्मदेच्या वाट्याला आलेले दुःख वाचकांनाही अस्वस्थ करून जाते.

मराठीतील स्त्रीवादी लेखिका म्हणून मनस्विनी लता रविंद्र यांची ओळख आहे. मराठीतील स्त्रीवादी नाटककार म्हणून त्यांच्याकडे पाहिले जाते. ब्लॉगच्या आरशापल्याड' या त्यांच्या कथासंग्रहास २०१६ सालचा साहित्य अकादमीचा युवा साहित्य पुरस्कार प्राप्त झालेला होता. याच कथासंग्रहातील माझ्या जन्माची गोष्ट हो कथा 'तिचा अवकाश' या कथासंग्रहात आली आहे. मनस्विनी लता रवींद्र यांच्या कथांच्या केंद्रस्थानी महानगरीय जीवन जाणिवा

असून स्त्री पुरुष संबंधातील बदलते आणि गुंतागुंतीचे संबंध उलगडून दाखवणे, कौटुंबिक जीवनातील नवी आव्हाने अशा अनेक विषयांना केंद्रस्थानी घेऊन त्यांच्या कथा प्रक्ट होतात 'माझ्या जन्माची गोष्ट' या कथेत आपल्या जन्मावरोवरच आई आणि आजीच्या जन्माच्या वेळची स्थिती ही लेखिकेने स्पष्ट केली आहे. आजीच्या जन्मावेळी असणारा रुढी-परंपरांचा पगडा आईच्या जन्मावेळी थोडा शिथिल झाला तर लेखिकेच्या जन्मावेळी मात्र त्यात खूपच बदल झाल्याचे लेखिकेने म्हटले आहे. काळ कोणताही असला तरी प्रसव वेदनेच्या कळा मात्र स्त्रियांना महन कराव्या लागतात ही वेदनाही येथे प्रकटली आहे. म्हणूनच लेखिकेच्या आईला तिची आजी म्हणते, जेव्हा माझा जन्म झाला तेव्हा माझे बाबा तिथे नव्हते. जेव्हा तुझा जन्म झाला तेव्हा तुझा बाबा माझ्याजवळ नव्हता. बहुतेक ही आपल्या घरची परंपराच आहे. त्यामुळेच पुरुषांना ती प्रसववेदना कळूच शकली नाही. मला नंतर भावंड झाली. माझ्या बावांनी तरी माझ्या आईच्या कळा बघितल्या. विव्हळणं बघितलं. आम्ही एकच मूल होऊ दिलं. त्यामुळे तुझ्या वावाला काही बघताच नाही आलं. कदाचित त्यामुळेच तो कायम स्थितप्रज्ञ आणि तटस्थ राहिला आल्यापासून. हे ऐकून माझ्या आईने मला मात्र मनोमन ठरवलं की आपण कधीच मूल होऊ द्यायचं नाही. वेदनाही नकोत आणि अपेक्षाही नकोत. प्रसव वेदना या स्त्रियांनाच सोसाव्या लागतात. स्त्रियांना आधार देण्यासाठी म्हणूनही त्यांचा पत्ती अशा संकटसमयी त्यांच्याजवळ नसतोत. हे दुःख या कथेच्या केंद्रस्थानी आहे. लेखिकेच्या जन्मावेळी तिचे बाबा हॉस्पिटलमध्ये हजर असणे हा बदलत्या परंपरेचा निर्देश आहे.

सामाजिक प्रश्नावरील कथाकार म्हणून प्रतिमा जोशी प्रसिद्ध आहेत. त्यांचा 'दंडकारण्य' हा कथासंग्रह प्रकाशित आहे. त्याचबरोबर मराठीत त्यांनी विपूल लेखनही केले आहे. या कथासंग्रहात त्यांची 'दरी' ही कथा आली आहे. वेश्या व्यवसाय करणाऱ्या स्त्रियांना संघटनात्मक रूप देऊन त्यांच्या न्याय हक्कासाठी भांडणाऱ्या संघटनांतील पदाधिकारी स्त्रिया आपल्याच तुंबड्या कसे भरून घेतात, वरवर वेश्यांना हक्क मिळवून देण्याची भाषा करून वेश्याव्यवसाय राजरोसपणे चालावा यासाठीची लायसनची मागणी करून या स्त्रियांनाच कशाप्रकारे बेबस बनवले जाणार आहे. याचे चित्रण या कथेत आले आहे. कलकत्याच्या बाईट एरियात धदा करणाऱ्या गिरीजावर बाहेरून येणाऱ्या वेश्यांची सोय करणाची जबाबदारी आहे. रीना मॅडम, अर्पणा मॅडम यांनी कलकत्याची कॉन्यान्य बोल आहे यासाठी बाहेरगावाहून आलेल्या अनुसया, आशा अशा कितीतरी वेश्याची दुःख, वेदना येथे प्रकट होताना दिसते अनुययाची मुलगी शेवटी नाईलाजाने का धंद्यात कशी उतरली आणि अनुययाची स्वप्न कशी धुळीस मिळाली? हे दुख अस्वस्थ करणारे आहे. वेश्याव्यवसायात कोणतीही मुलगी आनंदाने येत नाही तर तो यात फसवून आणली जाते हे वास्तव आशाच्या स्वकथनातून वाचकांच्या निदर्शनास येते ती म्हणते, इयं जमलेल्या साऱ्याच वायांची जिंदगी खाते-यात गेलेली. एक डाव खातेऱ्यात पडलं की पडलं त्यातून सुटावं कसं ? जलमाची घाण अंगाला चिकटली की मरस्तवर ती जायाची नाय कशी जावी? याया दुनियेची घाण ओतून घेतल्यावर आणि काय व्हायचं ? जलमभर अंगावरची कपडे उतरवण्याखेरीज हातात काय उरलंच नाय.

एकदा या व्यवसायात ओढली गेलेली मुलगी वा स्त्री यातून बाहेर पडू शकत नाही. तिला स्वतःचे असे कुटुंब, घर, नातलग राहत नाहीत. समाजाच्या दृष्टीने वेश्या ही गुन्हेगार ठरताना दिसते. या वेश्यांकडे जाणारा पुरुष मात्र गुन्हेगार नाही. वेश्येचे आयुष्य एकदा समजून घेतले तर समाज व शासन यांनी तिला सन्मान दिल्यास, रोजगार दिल्यास कितीतरी स्त्रिया या दलदलीतून बाहेर पडतील. दुर्दैवाने असे घडत नाही. या स्त्रियांसाठी काम करणाऱ्या संघटना, एनजीओज त्यातील पदाधिकारी स्त्रियाच वेश्यांच्या दुःखांचे भांडवल करून आपण मात्र आलिशान आणि ऐशोआरामीचे जीवन जगतात. संघटनात्मक पातळीवर ही या स्त्रिया पुन्हा नागवल्या जातात. प्रत्यक्ष वेश्या आणि त्यांच्यासाठी काम करणाऱ्या संघटनेतील या स्त्रिया यांच्यामध्येही खूपच मोठी दरी निर्माण होते. दोघींच्या जीवन जाणिवा देखील वेगळ्या असून दोन्हींच्या जीवनाचे असणारे वेगळेपण ही लेखिकेने येथे अधोरेखित करून वेश्यांच्या न संपणाऱ्या दुःखाची मांडणी केली आहे. पांढरपेशा समाजापासून दूर असणाऱ्या या स्त्रिया आणि त्यांच्या वेदना लेखिकेने या कथेच्या माध्यमातून वाचकांसमोर ठेवल्या आहेत. समाज आणि शासन यांनी पुढाकार घेऊन या स्त्रियांना न्याय मिळवून दिला पाहिजे हा माफक आशावादही या कथेतून व्यक्त झालेला दिसतो.

'तिचा अवकाश' या कथासंग्रहातील साऱ्याच कथा स्त्रियांचे वेगवेगळे प्रश्न मांडणाऱ्या असून स्त्रीजीवनाच्या न संपणाऱ्या प्रश्नांची मालिकाच यातून उभी केली आहे. स्त्रियांचे व्यक्त होणारे आणि अव्यक्त दुःखाचीही मांडणी केली आहे. काही ठिकाणी तर नव्या जगण्याच्या कल्पना मांडून स्त्रियांनी अधिक सजग व स्वयंपूर्ण झाले पाहिजे हा आग्रह धरल्याचे दिसते. तर परंपरा आणि रूढी यातून बाहेर पडून स्त्री स्वातंत्र्याचा पुरस्कार करताना या कथा दिसतात.